जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१७/४२५/प्र.क्र.१०५/र-८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १९/१०/२०१८

वाचा -

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
७) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५
८) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
९) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र: पुनर्व-९(१)/जा.क्र.-९६३, दि. १६/०८/२०१८

प्रस्तावना -

विभागीय आयुक्त, नाशिक यांनी संदर्भाधिन क्र.९ अन्वये जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणातील १९ नागरी सुविधा कामांची रु. ११,३४,७१,०४६/- एवढया रकमेची अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास सादर केली होती.

२ त्यानुसार नमूद करण्यात येते की, संदर्भाधिन क्र. ५ व ८ च्या शासन निर्णयांन्वये वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये वेळोवेळी सुधारणा केल्या आहेत. सदर सुधारणांनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२)(अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरीसह) मान्यता देण्याबाबत प्रशासकीय विभागास रु. ५ कोटी मर्यादेत पूर्ण अधिकार आहेत. त्यामुळे, नमूद मर्यादेपुढील व प्रस्तावित रु. ११३४.७१ लक्ष रकमेच्या नागरी सुविधा कामांना नियोजन व वित्त विभागाच्या पूर्वमान्यतेने प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय -

त्यानुसार, जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद १९ नागरी सुविधा कामांच्या एकूण रू. ११,३४,७१,०४६/- ( अक्षरी रूपये अकरा कोटी

चौतीस लक्ष एकाहत्तर हजार सेहचाळीस फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१ दि.१/८/२००९ व दि.२८/३/२०११ अन्वये पुनर्वसित/विस्तारीत गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनुसार असावी. तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम (१८) अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, अहमदनगर यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हापरिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

६) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची प्रकल्प यंत्रणेने दक्षता घ्यावी.

७) पुनर्वसन योजनेतून पुरविण्यात आलेल्या सदर सुविधा अन्य योजनेतून पुनश्च: पुरविल्या जाणार नाहीत याची विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी तसेच संबंधित यंत्रणा यांनी दक्षता घ्यावी.

२. **निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-**

**अ)** कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांच्या निविदा प्रक्रियेस संबंधित पाटबंधारे विकास महामंडळ यांचेकडून पूर्वपरवानगी व मान्यता घेण्याची आवश्यकता असणार नाही.

**क)** प्रस्तावाधीन पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन देण्यात येणार असल्यामुळे निविदा स्वीकृतीनंतर कार्यारंभ आदेश देण्यासाठी, संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून निविदा सांकेतांक घेण्याची आवश्यकता नाही.

**ड)** कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

३. कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांनी वरील क्र. २ नुसार सुरु करण्यात आलेल्या निविदा प्राप्त नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल(Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१८-२०१९ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी. सदर निधी मागणीसोबत जायकवाडी प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना यापुर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने उपयोजन प्रमाणपत्रे (Utilisation Certificates) प्रलंबित असल्यास सादर करावीत.

४. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.४.२०१५ अन्वये निर्गमित वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२)(अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२४५/२०१८/व्यय-१० दि. ४/१०/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१३०८१७७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.10.19 13:14:35 +05'30'

**(द.शं.मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) नाशिक विभाग, नाशिक
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नाशिक
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक अहमदनगर
४. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
६. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
८. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन ) अहमदनगर
९. कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर

१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर

११. जलसंपदा विभाग /मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.

१२. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय , मुंबई-३२

१३. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.

१४. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.

१५. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय, मुंबई ३२.

१६. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**********

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र:पुनर्व-२०१७/४२५/प्र.क्र.१०५/र-८,दि.१९/१०/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील प्रशासकीय मान्यता प्रदान एकूण १९ नागरी सुविधा कामांचा तपशील**

| अ क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामाचे नाव | अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | रामडोह | स्मशानभूमी पोहोच रस्ता खडीकरण करणे सा.क्र. ०/०० ते २/०० | ५६,२४,३८१/- |
| २ | वरखेड | गावठाण ते पाणीपुरवठा विहीर अंतर्गत रस्ता खडीकरण करणे सा.क्र. ०/० ते २/०० | ७७,२०,७६७/- |
| ३ | तरवडी | तरवडी ते अंतरवली रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र. ०/०० ते ३/०० | ९१,०३,३४४/- |
| ४ | गळनिंब | गळनिंब स्मशानभुमी पोहोच रस्ता खडीकरण करणे सा.क्र. ०/०० ते १/५०० | ५७,६८,९१२/- |
| ५ | सुरेगांव दहि | स्मशानभुमी पोचरस्ता खडीकरण सा.क्र. ०/०० ते २/०० | ५९,९०,३७९/- |
| ६ | खलालपिंप्री | ग्रामपंचायत कार्यालय बांधणे | २२,६५,१५४/- |
| ७ | जैनपूर | जुने जैनपूर ते बेलपिंपळगांव रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे सा.क्र.०/०० ते ३/००० | ९९,७५,३२०/- |
| ८ | माळेवाडी खालसा | माळेवाडी खालसा ते स्मशानभुमी रस्ता खडीकरण सा.क्र. ०/०० ते ०/५०० | २०,६७,१७४/- |
| ९ | प्रवरासंगम | प्रवरासंगम ते स्मशानभूमी रस्ता खडीकरण सा.क्र. ०/०० ते ०/५०० | २२,९४,००६/- |
| १० | सुरेगाव गंगा | सुरेगांव ते बेलपिंपळगांव रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र. १/५०० ते. ३/६०० | ९३,५५,४०४/- |
| ११ | सुरेगाव गंगा | सुरेगांव ते स्मशानभुमी रस्ता खडीकरण करणे सा.क्र ०/०० ते ०/६०० | २२,९१,९३२/- |
| १२ | उस्थळदुमाला | उस्थळ दुमाला ते निपाणीनिमगाव खडीकरण व डांबरीकरण सा.क्र.०/०० ते २/५०० | ९८,२२,७४६/- |
| १३ | जैनपूर | जैनपूर स्मशानभूमी रस्ता खडीकरण करणे सा.क्र. ०/०० ते ०/६०० | २२,४०,९९८/- |
| १४ | भालगांव | स्मशानभूमी पोहोचरस्ता खडीकरण करणे सा.क्र. ०/०० ते १/५०० | ३९,९०,५५१/- |
| १५ | प्रवरासंगम | प्रवरासंगम ते कोरडेवस्ती रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र. ०/० ते. २/२०० | ९८,७५,४२०/- |
| १६ | गोधेगांव | स्मशानभुमी पोचरस्ता खडीकरण करणे सा.क्र. ०/०० ते ०/९०० | ३०,०५,२०९/- |
| १७ | बहिरवाडी | ग्रामपंचायत कार्यालय बांधणे | २२,५१,४१८/- |
| १८ | बेलपांढरी | बेलपांढरी ते बेलपिंपळगांव रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे सा.क्र. ०/०० ते २/५०० | ९९,६४,९५६/- |
| १९ | बोरगांव | बोरगांव ते बोरगांव चौफुला रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र. ०/०० ते २/५०० | ९८,६२,९७५/- |
| | | **एकूण** | **११,३४,७१,०४६/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.10.19 13:14:51 +05'30'

**(द.शं.मुंजाळे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**